विग्रहविषयक एक उपपत्ती
*(ॲलन बील्स व बर्नार्ड सीगेल ह्यांच्या Divisiveness and Social Conflict चा अनुवाद)*
वसंत पळशीकर

कोणत्याही समाजात विग्रह नाही असे व्हायचे नाही, पण विग्रहाविषयी समाधानकारक उपपत्ती अद्यापपर्यंत कोणी पुराव्यासहित मांडलेली नाही, अशी प्रस्तुत ग्रंथाचे लेखक अॅलन बील्स व बर्नार्ड सीगेल यांची तक्रार आहे. हे दोघेही मानवसंस्कृतिशास्त्रज्ञ आहेत, आणि विशेषतः आपल्या सहोदर अभ्यासकांविरुद्ध त्यांची ही तक्रार आहे. यासंबंधी आजवर झालेला विचार सामाजिक गतिमानता ध्यानी न घेता झाला असे त्यांचे म्हणणे आहे. मानवसंस्कृतिशास्त्रज्ञांचा आजवरचा परिपाठ असा की, एक लहानसा समाज किंवा आदिवासी जमात निवडा- वयाची व तिची सखोल पाहणी करून तिचे अत्यंत परिपूर्ण चित्रण करावयाचे. हे चित्रण करीत असताना भिन्न भिन्न जीवनांगांचा परस्परांना आधार कसा आहे, अस्तित्वात असलेल्या प्रत्येक गोष्टीचे समाजधारणेच्या दृष्टीने कार्य कोणते, यांवर भर दिला जातो. असे करीत असताना वर्तमानकाळातला एक क्षण पकडून त्याभोवतीच हे सारे चित्रण करण्याकडे प्रवृत्ती असते. जणू त्या समाजाला भूतकाळ नव्हता व भविष्यकाळही नाही. प्रत्येक समाज हा समतोल अवस्थेत असतो असेही एक गृहीतकृत्य या अभ्यासांमध्ये आढळते. आणि मग साहजिकच, विग्रहदेखील समाजधारणेच्या दृष्टीने उपयुक्त कार्य करणारी एक घटना आहे असे गृहीत धरूनच विवेचन केले जाते. किंवा, विग्रह हा अनिष्ट मानला तरी, विग्रहाचा निरास करणाऱ्या यंत्रणाही त्या विशिष्ट संस्कृतीमध्ये कशा अस्तित्वात आहेत यावर भर दिला जातो- मूळचा समतोल विग्रहाने ढासळतो व तो परत प्रस्थापित होतो. विग्रहाची जैविक वा मानसशास्त्रीय उपपत्ती लावली जाते. सामाजिक वा सांस्कृतिक पातळीवरून विचार करता विग्रहाचे या प्रकारचे स्पष्टीकरण हे समाजाचे स्थितिस्थापकत्व गृहीत धरून केलेले असते असा लेखकद्वयांचा त्यावर आक्षेप आहे.

काही मानवसंस्कृतिशास्त्रज्ञांनी सामाजिक गतिमानतेची दखल घेतली आहे. पण यांपैकी बहुतेक सर्वांनीच सगळे समाज विकास- क्रमाच्या एका पथावर सरळ रेषेत प्रगतीच्या दिशेने अखंड वाट- चाल करीत आहेत असे गृहीत धरलेले दिसते. सर्व आदिवासी लोक-संस्कृती या क्रमाक्रमाने उत्क्रांत होत आधुनिक व्यामिश्र संस्कृतीत परिणत होणार असे गृहीत धरून, त्या भूमिकेतून काही आदिवासी समाजांतील अलीकडील परिवर्तनाचे केलेले चित्रण असे या अभ्यासांचे स्वरूप आहे. सामाजिक गतिमान- तेची दखल एकांगी, अमूर्त पातळीवरील आहे. अर्थ असा की कोणत्याही विवक्षित संघटनेतील गावजमातीतील वा समाजा- तील घडामोडी अशा सरळ रेषेतल्या प्रगतीच्या दिशेने सतत आरोहणाच्या स्वरूपाच्या असत नाहीत. लेखकांचे म्हणणे भारतातील काँग्रेस पक्षाचे उदाहरण घेऊन स्पष्ट करता येईल. १८८५ ते १९६९ या कालखंडात काँग्रेसच्या इतिहासात वाढ, विस्तार व विघटन या प्रक्रिया दिसून येतात. पण वाढीच्या कालखंडातही जहाल व मवाळ यांच्यातील फुटीने काँग्रेस संघ- टनेची पीछेहाट झाली होती. असे चढउतार प्रत्येक समूहाच्या इतिहासात दिसून येतात व त्यांचे स्पष्टीकरण ' प्रगती 'च्या, नियत ऐतिहासिक विकासक्रमाच्या तत्त्वाने होऊ शकत नाही.

पुष्कळदा विद्वानांना गोंधळात टाकणाऱ्या प्रश्नांची उत्तरे सामान्य शहाण्या माणसाजवळ चटकन सापडतात. प्रस्तुत ग्रंथातील पांडित्यपूर्ण विवेचन वाचताना वारंवार असा प्रत्यय येतो. उदाहरणार्थ, विग्रह हा नेहमीच संघटनेची, समूहाची धारणा करणारा असतो असे नाही, प्रत्येकच विग्रहाचा निरास करण्याची यंत्रणा व कुवत संघटनेच्या, समूहाच्या अंगी असत नाही, विग्रह विकोपाला गेल्यास त्यातून संघटना फुटतात, समाजात यादवीयुद्ध होते वा अनागोंदी माजते वा फाळणी घडून येते, हा आपल्या सर्वांच्या परिचयाचा अनुभव आहे. तसेच, विग्रहाचे अनेकदा निर्विवादपणे अनिष्ट परिणाम घडतात हेही कोणी पटवून द्यावयास हवे काय ? किंवा, एकदा मूळचा समतोल विग्रहाने ढासळल्यावर, तो विशिष्ट विग्रह निकालात निघाल्यानंतरही पूर्वीचा समतोल प्राप्त होण्याची शक्यता कमी असते, कारण मध्यंतरीच्या घटनांनी एक नवीच रचना अस्ति- त्वात आलेली असते, हेही आपल्या नित्याच्या अनुभवाचे नाही काय ? शास्त्रज्ञाचे बिरुद मिरविणारी मंडळीही कशी सुता- वरून स्वर्ग गाठतात, एखाद्या विवक्षित, सापेक्ष सत्याच्या आधारे सिद्धांतप्रणालीचा, सर्वव्यापी उपपत्तीचा पसारा उभा करतात ते पाहून करमणूक होते. असो.

विग्रह कसा उद्भवतो आणि फूट पडण्याइतका तो विकोपास का जातो त्याचे प्रामुख्याने लेखकांनी विवेचन केले आहे. ते करीत असता आपले म्हणणे स्पष्ट करण्यासाठी त्यांनी दोन गाव-जमातींची उदाहरणे घेतली आहेत. त्यांपैकी एक गाव म्हैसूर राज्यातील ( ' नामहळ्ळी') असून दुसरे अमेरिकेतील न्यू मेक्सिको राज्यातील ( ' ताओस') हे आहे. सारे पुस्तक वाचल्या- वर, आपले तात्त्विक विवेचन आणि आपण घेतलेली उदाहरणे यांचा अर्थपूर्ण संबंध प्रस्थापित करण्यात लेखक यशस्वी झालेले नाहीत असा मनावर ठसा उमटतो. केवळ वर्णनपर लेखन करण्याबद्दल इतर लेखकांवर ते टीका करतात, पण स्वतः ही ते वर्णनापलीकडे फारसे पुढे जाऊ शकलेले नाहीत.

पण त्यांनी केलेले तात्त्विक विवेचन विचारात घेण्यासारखे आहे. सर्वच विग्रह हे हानिकारक नसतात. उदाहरणार्थ, दोन संघांचा सामना हादेखील

एक विग्रहच किंवा अध्यक्षपदासाठी दोन व्यक्तींची धडपड हाही एक विग्रहच. यांपैकी पहिला हा कृतक - विग्रहाचा प्रकार, कारण खेळ संपला की विग्रहही संपतो. दुसरा हा नियंत्रित विग्रहाचा प्रकार म्हणता येईल; म्हणजे विग्रह हा एका अ-विग्रही व्यापक चौकटीत बसविलेला असतो. पण अध्यक्षीय उमेदवाराची निवड करण्यावरून काँग्रेस पक्षात आज जो विग्रह उपस्थित झाला आहे तो अनियंत्रित थराला जाऊन पोचण्याची चिन्हे दिसत आहेत. नियंत्रित व अनियंत्रित दोन्ही प्रकारच्या विग्रहांचा समावेश लेखकांनी ' विघटनकारी विग्रह' (डिसरप्टिव्ह कॉन्फ्लिक्ट ) या वर्गात केला आहे, त्याऐवजी नियंत्रित विग्रहाची वेगळीच कोटी करणे आवश्यक आहे. कारण इथे विग्रह खरा असला तरी व्यापक एकवाक्यतेच्या चौकटीत तो नियंत्रित केलेला असतो, आणि काही नियम व संकेत यांना धरून तो चालतो तेव्हा त्याचे परिणाम फुटीर, विघटनकारी होत नाहीत. याउलट अनियंत्रित विग्रहाची गोष्ट आहे. तो अनियंत्रित असल्याकारणाने अमर्याद व सर्वसमावेशक बनण्याकडे त्याचा कल असतो. या अनियंत्रित विघटनकारी विग्रहास उद्देशून लेखकांनी 'गटबाजीचे भांडण' (फॅक्श- नॅलिस्ट डिस्प्यूट ) असा शब्दप्रयोग वापरला आहे. याचे दोन उपप्रकार त्यांनी केलेले आहेत. एक ' सर्वगामी गटबाजी ( पर्व्हेझिव्ह फॅक्शनॅलिझम) आणि दुसरा 'दु-फळी गटबाजी' (स्किस्मॅटिक फॅक्शनॅलिझम). पहिल्या प्रकारात त्या विशिष्ट संघटनेत, समाजात सर्व पातळ्यांवर व सर्वत्र विग्रह आढळून येतो- भावाभावांत, नवरा-बायकोत, वडील-मुलगा यांत, शेजाऱ्यांमध्ये, मोहल्ल्यांमध्ये, सर्वत्र ; अशा ठिकाणी गट हे अस्थिर असतात, त्यांचे सभासदत्व सारखे बदलत असते. दु-फळी गटबाजी' मध्ये एकेका फळीत एकसंधता असते, अंतर्गत गट- एकी असते. प्रस्तुत ग्रंथात ज्या दोन गावांची उदाहरणे घेतली आहेत त्या दोन्ही गावांत सर्वगामी गटबाजीच आढळते असे लेखकांचे प्रतिपादन आहे.

माणसामाणसांत, समाजात विग्रह उत्पन्न होतो याचा अर्थ मूलतः दोन व्यक्ती किंवा दोन गट एकमेकांना विरोध करतात असा होतो. विरोधातून उत्पन्न होणारा विग्रह हा संघटनेने वा समाजाने स्वीकृत केलेल्या उद्दिष्टांना धोक्यात आणणारा आहे. असे वाटले म्हणजे तो विघटनकारी ठरतो. वा एखादा विग्रह विघटनकारी आहे हे लक्षात न येताही त्या विग्रहाने समाज- बांधणीची मूळ सूत्रे जर तुटली तर तो विघटनकारी ठरतो. (उद्दिष्टांबाबत एकवाक्यता संपुष्टात येईल तेथे ' विघटनकारी विग्रह' हा शब्दप्रयोगच काहीसा निरर्थक ठरतो.) याचा अर्थ असा की, समाजाची बांधणी काही सूत्रांच्या आधारे केली जाते. पहिल्या सूत्रास तंत्रविद्यात्मक असे म्हणता येईल. भोवतालच्या नैसर्गिक सामाजिक वातावरणात एका समाजाची बांधणी यशस्वीपणे करण्यासाठी काही तांत्रिक प्रश्नांची - पुरेसा अन्न-वस्त्र-निवारा मिळविणे यांसारख्या- सोडवणूक करावी लागते. ही सोडवणूक करण्यासाठी काही विशिष्ट प्रकारची सामाजिक रचना स्वीकारावी असे ठरते, ते दुसरे सूत्र म्हणता येईल. पण तांत्रिक उपाययोजना शंभर टक्के कधीच पुऱ्या पडत नाहीत. काही समस्यांना कायमची उत्तरे न सापडल्याने त्या टांगत्या राहतात. तसेच तांत्रिक उपाययोजनांमधून आणखी काही प्रश्न उपस्थित होतात. तीच गोष्ट सामाजिक रचनेची. म्हणून मग काही श्रद्धा, काही मूल्ये रुजविली जातात, काही आचारधर्म सांगितले जातात. अशी ही गुंतागुंतीची एक संगतवार बहुअंगी रचना म्हणजच त्या समाजाची संस्कृती जागांवर आघात होईल अशा घटना बाह्य जगतात घडल्या असे म्हणता येईल. म्हणजे अनियंत्रित विघटनकारी विग्रह माजतो असे लेखकांचे सूत्ररूपाने प्रतिपादन आहे व तो त्यांचा विशेष सहभाग म्हणता येईल.

म्हैसूरमधील नामहळ्ळी व न्यू मेक्सिकोमधील ताओस या दोन्ही गावांची संस्कृती या दृष्टीने पाहता तिची काही वैशिष्ट्ये लक्षात येतात. पहिले वैशिष्ट्य असे की पाऊसपाणी, हवामान, रोगराई, या नैसर्गिक घटनांवर या समाजांचा अंकुश नसल्या- कारणाने व्यक्ति व समाज यांच्या पापपुण्याचा, ईश्वरी लीलेचा हवाला देऊन यशापयशाचा खुलासा केला गेला. यातही ताओस गावाच्या संस्कृतीचा भर सर्वस्वी योग्य विधींचे पालन करण्यावर आहे. नामहळ्ळी संस्कृतीतली धर्मप्रणाली अधिक व्यामिश्र आहे. त्या सगळ्यांच्या खोलात न जाता येथे आपण इतके लक्षात घेतले तरी पुरे की, समाजातल्या सर्व व्यक्तींचे वर्तन योग्य, विधीपूर्वक, आचारधर्मांना अनुसरून होईल हे पाहिले जाण्याची आवश्यकता या दोन्ही संस्कृतींमध्ये बाह्य निरंकुश निसर्गावरील उपाय योजना म्हणून प्रतिपादिली गेली. परिणामी या दोन्ही गावांच्या समाजांची रचना अधिसत्तावादी झाली. यास आणखी एका परिस्थितीचाही हातभार लागला. दोन्ही गावांना बाहेरच्या जगातून होणाऱ्या आक्रमणास - शासनाच्या वा दरोडेखोरांच्या- 'तोंड द्यावे लागत असे. त्यासाठी गावात दृढ एकोपा व एकमुखी नेतृत्व या दोन्हींची गरज होती. यातून 'पाचामुखी परमेश्वर, ' सर्वसंमतीने निर्णय' ही मूल्ये अस्तित्वात आली. म्हणून आपणास असेही आढळते की विग्रहांचा निरास करण्याच्या यंत्रणा व शिष्टमान्य संकेत व रीती पण त्या त्या संस्कृतींत "निर्माण झालेल्या होत्या.

या ग्रंथकारांचा तात्त्विक विवेचनातील विशेष सहभाग या इथे आहे. समाज स्वतःच्या धारणेसाठी जी श्रद्धाप्रणाली- मूल्यप्रणाली व समाजरचना निर्माण करतो त्यांत अपरिहार्य - पणे काही कच्चे दुवे, काही विसंगती राहूनच जातात. कारण अनेक व्यक्तींचा घटकांचा मिळून समाज बनलेला असतो; अनेकांचे भिन्नभिन्न हितसंबंध एकत्र आणून त्यांची एक मोट बांधलेली असते. त्याचप्रमाणे एका व्यक्तीस एकाच वेळी वेगवेगळ्या परस्परविरोधी भूमिका वठवाव्या लागतात. उदा. सरपंच हा त्याच वेळी जमीनदार, पिता, नवरा, इ. वेगवेगळ्या भूमिका वठवीत असतो, आणि

या भूमिकांमध्ये विसंवाद उत्पन्न होऊ शकतो. काही लोक हीन जातीचे तर काही श्रेष्ठ, काही स्पृश्य तर काही अस्पृश्य हा जाति- विचार 'अहं ब्रह्मास्मि 'च्या विचाराशी, प्रत्यक्ष अनुभवाशीदेखील विसंवादी आहे. म्हणजेच जातिव्यवस्था हा एक कच्चा दुवा आहे. सारांश, प्रत्येक समाजात अशा अंतस्थ तणाव्याच्या जागा असतात.
नामहळ्ळी व ताओस या दोन्ही गावांत सर्वगामी गटबाजी माजण्याचे पुढील प्रमुख कारण लेखकांनी सांगितले आहे. ते म्हणतात की, ही पिरॅमिडसारखी अधिसत्तावादी रचनाच अशी असते की त्यातील कोणत्याही एका स्तरावरील सत्ताधाऱ्याचे स्थान डळमळीत झाल्यास सारी रचना धोक्यात येते. आणि गेल्या दीडशे वर्षांत जे फेरबदल बाहेरच्या जगात झाले - निसर्गा- वर मानवाचा जय झाला, एका केंद्रीय सत्तेच्या स्थापनेमुळे परचक्रांचे भय नष्ट झाले, केंद्रीय शासनाने अनेक जबाबदाऱ्या परस्पर उचलल्या-त्यामुळे गावांतल्या ज्येष्ठ मंडळींचे स्थानच खच्ची झाले.
पण या बाबतीत कोणताही सर्वसामान्य, सर्वत्र लागू पडेल असा कार्यकारण संबंध घालून देता येत नाही. प्रत्येक समाजानुरूप बदलणारे इतके विवक्षित घटक आढळतात की तोच एक बाह्य आघात निरनिराळ्या समाजांवर वेगवेगळा परिणाम करून जातो. याउपरही एकच समाज आज एक प्रति- साद देईल तर दोन महिन्यांनी सर्वस्वी वेगळा प्रतिसाद देईल. समाजातील अंतःस्थ तणावे, समाजाचे विवक्षित नैसर्गिक - सामाजिक वातावरण, आणि बाह्य आघात विवक्षित समाजाला कोणत्या रूपाने जाणवतो ते स्वरूप यांबाबत 'समाज तितक्या प्रकृती' हा न्याय आढळत असल्याने अनियंत्रित विघटनकारी विग्रह का उपस्थित होतो याविषयी एक सर्वसामान्य उपपत्तीच तेवढी पुढे मांडता येते. लेखकांनी आशा केली आहे त्याप्रमाणे विग्रहाच्या वाढत्या तीव्रतेचे वा प्रसरणाचे टप्पे यांचा आलेख, जो सर्व उदाहरणांना लागू पडेल, असा काढता येणार नाही आणि जो काढता येईल तो न काढताही सर्वांना परिचित असा असेल. उदाहरणार्थ, ' भांडण वाढविल्याने ते विकोपास जाते या स्वरूपाचा. या बाबतीत प्रत्यक्ष उदाहरणांचे सूक्ष्म तपशील- वार, साद्यंत चित्रण हीच गोष्ट सर्वांत उद्बोधक ठरणारी आहे. अनियंत्रित विग्रह हे अखेरीस मानवी नाट्य आहे व ते कसे उलगडत जाईल ती गोष्ट नियमांच्या अधीन असत नाही.
या दृष्टीने विचार करता, नियंत्रित विग्रह आणि अनियंत्रित विग्रह यांतला एक महत्त्वाचा फरक लेखकांच्या नजरेतून सुटला आहे. नियंत्रित विग्रहामध्ये माणूस आपले सर्वस्व पणाला लावीत नाही आणि म्हणूनच तो काही संकेतांनी, सामाजिक यंत्रणांद्वारा विग्रह नियंत्रित करण्यास संमती देतो. आपले सर्वस्व पणाला लावावे अशी विग्रहाची क्षेत्रे फार थोडी असतात ही समज समाजात वाढणे आणि सन्माननीय माघारीस जागा मोकळी राहील अशी समाजातील वर्तनाची पद्धती असणे या गोष्टींना या संदर्भात महत्त्व प्राप्त होते. एका दृष्टिकोणातून पाहता लोकशाही पद्धतीची नेमकी ही वैशिष्ट्ये आहेत असे लक्षात येईल : ' तुटेपर्यंत न ताणता तडजोडीने घ्यावे' हे लोकशाहीचे सूत्र आहे.
जेव्हा विग्रहाच्या दोन पक्षांत उद्दिष्टांबाबत एकवाक्यता असत नाही तेव्हा, त्यांतील एका पक्षास जे विघटन अनिष्ट वाटेल ते दुसऱ्या पक्षास नव्या स्वरूपाच्या संघटनेसाठी आवश्यक वाटेल. अशा प्रसंगी 'विघटनकारी विग्रह' हा शब्दप्रयोग, शब्दशः अर्थ घेतल्यास, लागू पडत असला तरी, या विग्रहाची कोटी पुन्हा वेगळीच करणे आवश्यक ठरते. एकत्र कुटुंब पद्धती, स्त्री-पुरुष संबंध, लैंगिक संबंध, जातिव्यवस्था - अशी जीवनाची अनेक क्षेत्रे आहेत की ज्यांमध्ये आज जुने व नवे यांच्यात जुन्याचे विघटन करणारा विग्रह चालला आहे. विग्रहाचा हा प्रकार वास्तविक नामहळ्ळी व ताओस या समाजांमध्ये ही आज घडीला अस्तित्वात आहे. किंबहुना, या दोन गावातील विग्रहाचे जे वर्णन लेखकांनी केले आहे ते याच कोटीत बसते. अधिसत्तावादी रचनेची, समान धार्मिक विधींच्या आचाराची गरजच नव्या काळात उरलेली नाही. तेव्हा लोक सरपंचाचे ऐकत नाहीत, मुलगा बापाच्या आज्ञेत रहात नाही, धार्मिक विधींचे योग्य पालन होत नाही, या गोष्टी इतः पर विघटनकारी उरलेल्या नाहीत, कारण समाजधारणेसाठी त्यांची गरज संपलेली आहे. नामहळ्ळी व ताओस या गावजमातींच्या जीवितास प्रत्यक्ष धोका उत्पन्न झाला असताही जर नव्या- जुन्यातील विग्रहाचा परिणाम म्हणून गाव एकत्र येऊ शकले नाही तरच त्यास विघटनकारी विग्रह म्हणता येईल. तसा पुरावा लेखकांनी सादर केलेला नाही. आजच्या बृहत् समाजरचनेत गावसमाज हा पूर्वीइतका एकसंध, एकात्म असण्याची गरजच उरलेली नाही. त्यामुळे पूर्वी ज्या विग्रहांमुळे गावसमाजाचे ऐहिक अस्तित्वच धोक्यात आले असते असे अनेक विग्रह आज बिनघोरपणे चालू शकतात. अशा रीतीने वरकरणी विघटनकारी वाटणारा विग्रह हा खरोखरीच विघटनकारी आहे वा नाही ते त्या गावसमाजाच्या (वा संघटनेच्या) सामाजिक व्यवस्थेवर बऱ्याच प्रमाणात अवलंबून राहील. या दृष्टीने पाहता प्रचलित लोकशाही समाजव्यवस्था ही विग्रहांना सामावून घेऊन चालणारी आहे, त्या दृष्टीने ती लवचिक आहे असे तिचे वैशिष्ट्य आढळून येईल. हा मुद्दाही ' लेखकांच्या नजरेतून सुटला आहे.